पोलीस ठाण्यांमध्ये प्रायोगिक तत्वावर सीसीटीव्ही बसविणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः सीसीटी-३६१५/प्र. क्र. १३०/भाग-१/पोल-३

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २० जून, २०१८

वाचा :-

१) मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचे क्रिमिनल रिट पिटीशन क्र. २११०/२०१४ वरील दि.१३.८.२०१४, दि.२१.१०.२०१५, दि.२४.०२.२०१६, दि.२१.०९.२०१६ व दि.३०.११.२०१६ रोजीचे आदेश.

२) मा. सर्वोच्च न्यायालयाचे क्रिमीनल रिट पिटीशन क्र. ५३९/१९८६ वरील दि.२४.७.२०१५ रोजीचा न्यायनिर्णय.

३) सचिव,माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई यांचे क्र.संकीर्ण-२०१२/प्र. क्र. ३७/१८, दि.४.३.२०१३ चे पत्र.

४) गृह विभाग, शासन निर्णय क्र.सीसीटी-३६१५/प्र.क्र.१३०/पोल-३,दि.२३.११.२०१५.

५) शासन निर्णय, उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.भांखस-२०१४/प्र. क्र. ८२/भाग-III/उदयोग-४, दि.३०.१०.२०१५ व दि.०१.१२.२०१६.

६) सामान्य प्रशासन (माहिती व तंत्रज्ञान) विभाग,शासन निर्णय क्र. मातंसं-१७१६-३६१५/प्र.क्र.२८६/३९ दिनांक ०९.०८.२०१६

७) गृह विभाग, शासन निर्णय क्र.सीसीटी-३६१५/प्र.क्र.१३०/भाग -१ /पोल-३,दि.६.०१.२०१७.

८) गृह विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र.सीसीटी-३६१५/प्र.क्र.१३०/भाग-१/पोल-३, दि.१०.०१.२०१७.

९) पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई यांचे पत्र क्र.पोआ/आ.कक्ष/८५/२०१७, दिनांक २७.०१.२०१७.

१०) शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र. क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.४.२०१५

११) शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.४.२०१७

१२) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ लि.यांचे दि.२ जानेवारी,२०१८ रोजीचे पत्र.

१३) महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ लि.यांचे दि.११ जानेवारी, २०१८ रोजीचे देयक.

१४) गृह विभाग, शासन निर्णय क्र.सीसीटी-३६१५/प्र.क्र.१३०/भाग-१/पोल-३,दि.१७.०१.२०१८.

१५) पोलीस उप-आयुक्त (मुख्यालय-१), पोलीस आयुक्त कार्यालय, बृहन्मुंबई यांचे दि.१८ एप्रिल,२०१८ रोजीचे पत्र.

प्रस्तावना :-

लिओनार्ड झेविअर वल्दारीस व इतर विरुध्द यांनी महाराष्ट्र शासन व इतर यांचेविरुध्द मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे क्रिमिनल रिट पिटीशन क्र. २११०/२०१४ दाखल केली आहे. मा. उच्च न्यायालयाने

विषयांकीत याचिकेमध्ये दि.१३.८.२०१४ व दि.२४.०२.२०१६ रोजी आदेश पारित केले आहेत. मा. मुंबई उच्च न्यायालयाने पोलीस कोठडीतील मृत्यु रोखण्यासाठी राज्यातील प्रत्येक पोलीस ठाण्यांमधील प्रत्येक कॉरीडॉर, रुम व लॉकअप यामध्ये सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्याबाबत आदेशित केले आहे. ही बाब विचारात घेवून प्रायोगिक तत्वावर पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे अधीनस्त २५ पोलीस ठाण्यांमधील चार्ज रुम, लॉकअप, मार्गिका, स्टेशन हाऊस इ. पाच ठिकाणी सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्याबाबत उपरोक्त संदर्भाधिन क्र.५ येथे नमूद दिनांक २३.११.२०१५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकिय मान्यता देण्यात आली होती. त्यानुसार पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी संदर्भाधिन क्र.६ येथे नमूद दिनांक ३१.०५.२०१६ च्या पत्रान्वये दिलेल्या माहितीनुसार सर्व २५ पोलीस ठाण्यांमध्ये आदेशात नमूद ठिकाणी सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्याची प्रक्रिया पुर्ण झाली आहे.

तद्नंतर प्रस्तूत प्रकरणी मा.न्यायालयाच्या आदेशानुसार पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी संदर्भाधिन क्र.८ येथे नमूद दिनांक २८.१२.२०१६ च्या पत्रान्वये त्यांच्या अधिनस्त २५ पोलीस ठाण्यांचे वरिष्ठ पोलीस निरीक्षकांचे दालन, पोलीस स्थानकांचा संपूर्ण परिसर व सर्व कक्षासाठी (महिला कक्ष व विश्रांती कक्ष वगळून) एकुण ४१० सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्याची आवश्यकता असल्याचे नमूद करुन सदर ४१० सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यासाठी आवश्यक असणारे Infrastructure, एक वर्षाच्या रेकॉर्डींग क्षमतेसाठी आवश्यक हार्डवेअर, Installation and Commissioning व ३ वर्षाची वॉरंटी यासाठी एकूण अंदाजे रु.२,७५,००,०००/- (अक्षरी रु.दोन कोटी पंच्च्याहत्तर लाख फक्त) इतका निधी उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव सादर केला. त्यानुषंगाने सदर प्रस्तावास संदर्भाधिन क्र.७ येथे नमूद दिनांक ६.१.२०१७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली. सदरहू वस्तुस्थिती व पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई व पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई यांनी केलेल्या विनंती लक्षात घेवून पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अधिनस्त २५ पोलीस ठाण्यांसाठी ४१० सीसीटीव्ही कॅमेरे खरेदी करण्याची कार्यवाही सत्वरपणे राबविण्याबाबत प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान) तथा अध्यक्ष, महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ यांना विनंती करण्यात आली. त्यानुसार त्यांनी या प्रकरणी निविदा प्रक्रिया पूर्ण केली आहे व यासाठी येणारा रु.१,३५,३९,४३८/- (अक्षरी रुपये एक कोटी पस्तीस लाख एकोणचाळीस हजार चारशे अडोतीस) एवढा निधी महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ लि. यांच्याकडे तात्काळ वर्ग करण्याची विनंती उपरोक्त संदर्भाधिन क्र.१२ येथील दि.२ जानेवारी,२०१८ रोजीचे पत्रान्वये केली केली असून त्याप्रमाणे संदर्भाधिन क्र.१३ येथील दि.११ जानेवारी,२०१८ रोजीचे देयक सादर केले आहे. त्यानुसार संदर्भाधिन क्र.१४ येथे नमूद दिनांक १७.०१.२०१८ च्या शासन निर्णयान्वये रु.१,३५,३९,४३८/- (अक्षरी रुपये एक कोटी पस्तीस लाख एकोणचाळीस हजार चारशे अडोतीस) एवढा निधी महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळास वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली होती. तथापि, तद्नंतर पोलीस उप-आयुक्त

(मुख्यालय-१), बृहन्मुंबई यांनी उपरोक्त रकमेचे देयक अधिदान व लेखा कार्यालयास सादर केले असता अधिदान व लेखा कार्यालयाने सदरचे देयक आक्षेपांसह परत केले होते. आक्षेपांची पूर्तता करुन देयक अधिदान व लेखा कार्यालयास फेरसादर केले असता अधिदान व लेखा कार्यालयाने सदर देयकासोबत वित्तीय वर्ष सन २०१८-१९ ची BDS जोडून देयक सादर करण्याबाबत कळवून देयक परत केले, परंतु वित्तीय वर्ष सन २०१८-१९ मध्ये सदर लेखाशिर्षाखाली अनुदान उपलब्ध नसल्याने सदरचे देयक फेरसादर करता आले नसल्याचे संदर्भाधिन क्र.१५ येथे नमूद दिनांक १८ एप्रिल, २०१८ च्या पत्रान्वये कळविले आहे. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

१. पोलीस आयुक्त, मुंबई शहर यांच्या अधिनस्त २५ पोलीस ठाण्यांमध्ये सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यासाठी आवश्यक असणारा एकूण रु.१,३५,३९,४३८/- (अक्षरी रुपये एक कोटी पस्तीस लाख एकोणचाळीस हजार चारशे अडोतीस ) एवढा निधी महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळास वितरीत करण्यास मान्यता देण्यात आलेल्या संदर्भाधिन क्र.१४ येथील दि.१७.०१.२०१८ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे.

**२.** मा.न्यायालयाच्या उपरोक्त संदर्भाधिन क्र.१ येथील आदेश विचारात घेवून पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अधिनस्त खालील तक्त्यात नमूद २५ पोलीस ठाण्यांमधील वरिष्ठ पोलीस निरीक्षकांचे दालन, पोलीस स्थानकांचा संपूर्ण परिसर व सर्व कक्षांसाठी (महिला कक्ष व विश्रांती कक्ष वगळून) एकुण ४१० सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यासाठी आवश्यक असणारा रु.१,३५,३९,४३८/- (अक्षरी रुपये एक कोटी पस्तीस लाख एकोणचाळीस हजार चारशे अडोतीस ) एवढा निधी महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळास वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | परिमंडळ | पोलीस ठाणे |
|---|---|---|
| १. | पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-१ | १) कुलाबा पोलीस ठाणे |
| | | २) एम.आर.ए. पोलीस ठाणे |
| २. | पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-२ | ३) व्ही.पी. मार्ग पोलीस ठाणे |
| | | ४) दा.भ. मार्ग पोलीस ठाणे |
| ३. | बंदर परिमंडळ | ५) वडाळा पोलीस ठाणे |
| ४. | पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-३ | ६) नागपाडा पोलीस ठाणे |
| | | ७) वरळी पोलीस ठाणे |
| ५. | पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-४ | ८) काळाचौकी पोलीस ठाणे |
| | | ९) आर.ए.के. मार्ग पोलीस ठाणे |
| ६. | पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-५ | १०) माहिम पोलीस ठाणे |
| | | ११) कुर्ला पोलीस ठाणे |

| अ.क्र. | परिमंडळ | पोलीस ठाणे |
|---|---|---|
| ७. | पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-६ | १२) चेंबुर पोलीस ठाणे |
| | | १३) नेहरुनगर पोलीस ठाणे |
| ८. | पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-७ | १४) घाटकोपर पोलीस ठाणे |
| | | १५) विक्रोळी पोलीस ठाणे |
| ९. | पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-८ | १६) वाकोला पोलीस ठाणे |
| | | १७) बांद्र-कुर्ला पोलीस ठाणे |
| १०. | पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-९ | १८)सांताक्रुझ पोलीस ठाणे |
| | | १९) जुहू पोलीस ठाणे |
| ११. | पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-१० | २०) पवई पोलीस ठाणे |
| | | २१) एम.आय.डी.सी.पोलीस ठाणे |
| १२. | पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-११ | २२) मालाड पोलीस ठाणे |
| | | २३) मालवणी पोलीस ठाणे |
| १३. | पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-१२ | २४) दिंडोशी पोलीस ठाणे |
| | | २५) दहिसर पोलीस ठाणे |

३. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचेकडील वार्षिक योजना सन २०१७-१८ अंतर्गत खरेदी प्रक्रिया पूर्ण झालेल्या यंत्रसामग्री व साधनसामग्रीच्या रु.१,३५,३९,४३८/- (अक्षरी रुपये एक कोटी पस्तीस लाख एकोणचाळीस हजार चारशे अडोतीस ) इतक्या रकमेची खरेदी सन २०१८-१९ मधील मंजूर अनुदानातून करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर रक्कमेची देयके अदा करतांना आयकर व इतर प्रचलीत कर वजाती करुन अदा करण्यात यावी.

५. महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाने सदरचा निधी प्रकल्प संचालक कंपनीस वितरीत करताना याबाबत केलेल्या करारनाम्यातील अटी व शर्तीनुसार वितरीत करावा.

६. प्रस्तुत प्रकरणी उपरोक्त प्रमाणे होणारा खर्च हा “मागणी क्र.बी-१०, ४०५५ - पोलीस यावरील भांडवली खर्च, ८०० इतर खर्च, (००) (०९) सीसीटीव्ही यंत्रणा बसविणे (४०५५ ०२२३) या अंतर्गत ५२- यंत्रसामग्री व साधनसामग्री” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७. सदरहु निधी आहरीत करण्यासाठी पोलीस आयुक्त, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिका-याला आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषीत करण्यात येत आहे. त्यानुसार आहरण व संवितरण अधिकाऱ्याने सदर निधी कोषागारातून आहरित करुन या निधीचा धनादेश Maharashtra Information Technology Corporation Limited या महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाच्या युनियन बँक ऑफ इंडीया, नरिमन पॉईंट शाखा, मुंबई येथील खाते क्र.३७८९०२०५००००२१२ (IFSC Code : UBIN०५३७८९६) या खात्यावर जमा करण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.४.२०१७ ला अनुसरुन प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारान्वये तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ मधील वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-तीन, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेदांखाली प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व अनु.क्र. २७ अ, नियम क्र.७६ अन्वये प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२११७५३०६९९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kailas A. Gaikwad

Digitally signed by Kailas A. Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, cn=Kailas A. Gaikwad
Date: 2018.06.21 17:52:14 +05'30'

**( कैलास गायकवाड )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
२. मा. विरोधीपक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री,गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री,गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव.
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, गृह (विशेष), मंत्रालय, मुंबई.
१०.प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई.
११.पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२.पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
१३.महालेखालपाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१४.अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१६.श्रीमती मानकुंवर देशमुख, अति. सरकारी अभियोक्ता, मुंबई उच्च न्यायालय (ए. एस.), मुंबई.
१७. वित्त विभाग (व्यय-७/वित्तीय सुधारणा) मंत्रालय, मुंबई-३२
१८. सहसचिव (पोल-१४), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१९. निवडनस्ती, पोल-३.